मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई तसेच राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण या कार्यालयांमध्ये दैनंदिन जमा होणाऱ्या रक्कमांसाठी नवीन लेखाशीर्ष मंजूर करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएसीटी-२०१५/प्र. क्र.५६/परि-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: ५ एप्रिल २०१७

**प्रस्तावना –**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई तसेच राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, मुंबई यांच्या कार्यालयामध्ये "प्रमाणित प्रती" आणि "न्यायालयाने ठोठावलेला दंड" याकारणास्तव दैनंदिन जमा होणाऱ्या रक्कमा या अनुक्रमे "८४४३५०६५" व "००४१००४१" या लेखाशीर्षाखाली भरणा करण्यात येत होत्या. प्रस्तुत बाबींस मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी तपासणी अहवालामध्ये तसेच रिझर्व्ह बँकेकडून आक्षेप नोंदविण्यात आल्यामुळे प्रस्तुत कार्यालयातील दैनंदिन जमा होणाऱ्या रक्कमेसाठी नवीन लेखाशीर्ष मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई आणि राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, मुंबई या कार्यालयातील "प्रमाणित प्रती" व "न्यायालयाने ठोठावलेला दंड" या कारणास्तव दैनंदिन जमा होणाऱ्या रक्कमांचा भरणा करणेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष मंजूर करण्यात येत आहे.

| **१) प्रमाणित प्रती** | |
|---|---|
| ००७०-इतर प्रशासकीय सेवा | 0070-Other Administrative Service |
| ०१-न्यायदान | 01-Administration of Justice |
| ५०१-सेवा व सेवा फी | 501-Service and Service Fees |
| (०१)(०८) उपलब्ध करुन दिलेल्या सेवेची वसुली | (01)(08) Collection of fees for the service rendered |
| (००७० ०३५९ ०१) | (0070 0359 01) |

| **२) न्यायालयीन दंड** | |
|---|---|
| ००७०-इतर प्रशासकीय सेवा | 0070-Other Administrative Service |
| ०१-न्यायदान | 01-Administration of Justice |
| १०२-दंड व जप्ती रक्कम | 102-Fine and Forfeitures |
| (०१)(०२) दंडाधिकारी विषयक दंड | (01)(02)-Fees and as fines imposed by the tribunal for Motor Accident |
| (००७० ०२१४ ०१) | (0070 0214 01) |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३३३/अर्थ-११/१६, दि.२.४.२०१६ तसेच महालेखापाल (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्या क्र. ख. वि./चा-१/गृहविभाग/युओआर-७५/२०१५-१६/७१०, दि.८.९.२०१५ व क्र.ख.वि/चा-१/गृह विभाग/युओआर-११०/२०१५-१६/१०५२, दि.२१.१२.२०१५ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०५१५१०१००७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.04.05 15:11:46 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई
२. पिठासीन अधिकारी, राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, मुंबई
३. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिलेट साईड), मुंबई (पत्राने)
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, परि-५